महाराष्ट्र राज्य आंतर विद्यापीठ क्रीडा महोत्सव-२०२४ अंतर्गत आयोजित सांस्कृतिक कार्यक्रमासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२५/प्र.क्र.११०(ई.नं.९९२४१५)/सां.का.४
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८ मार्च, २०२५

संदर्भ :- पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण ८२२५/ प्र.क्र.११०(ई.नं.९९२४१५)/सां.का.४, दि. १८ फेब्रुवारी, २०२५.

**प्रस्तावना :-**

विविध सांस्कृतिक कार्यक्रम व उपक्रमांचे आयोजन या विभागामार्फत करण्यात येते. गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली यांना २६ व्या महाराष्ट्र राज्य आंतर विद्यापीठ क्रिडा महोत्सव - २०२४ चे यजमानपद मिळालेले आहे. सदर क्रिडा महोत्सव दिनांक १८ ते २२ फेब्रुवारी, २०२५ दरम्यान चंद्रपूर आणि बल्लारपुर स्थित उपलब्ध तालुका क्रीडा संकूल, विसापूर ता. बल्लारपूर, जि. चंद्रपुर मैदानावर घेण्याचे नियोजन करण्यात आले आहे. आयोजनाच्या अंदाजित रुपये रु.५०,१०,०००/- इतका खर्च आहे. सन २०२४-२५ या वर्षाकरीता विशेष कार्यक्रमाचे आयोजन रकमेस उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आता, त्यास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली यांना २६ व्या महाराष्ट्र राज्य आंतर विद्यापीठ क्रिडा महोत्सव - २०२४ कार्यक्रमांचे आयोजनाकरीता येणाऱ्या अंदाजित खर्च रुपये ५०,१०,०००/- (अक्षरी रुपये पन्नास लक्ष दहा हजार फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०२), राज्य, नृत्य, नाटय, तमाशा व संगीत महोत्सव (२२०५ १५०७)-५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ व १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. २२२/२०२५, व्यय १५, दि. २६/०३/२०२५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२८१२०२५४२८२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BALASAHEB
ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac717 15d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC 9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.28 12:03:48 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.४ ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र , मुंबई
११. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२. निवड नस्ती, सां.का.४